राज्यातील इतर मागास वर्ग या प्रवर्गातील मुलांसाठी १८ व मुलींसाठी १८ असे एकूण ३६ वसतिगृहांना मान्यताबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विमुक्त जाती व भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : इमाव-२०१६/प्र.क्र.५८/विजाभज-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० जानेवारी, २०१९.

**प्रस्तावना :-**

एकविसावे शतक हे स्पर्धात्मक युग असून त्यामध्ये इतर मागास वर्ग या प्रवर्गातील विद्यार्थ्यांना टिकून राहणे, इतर प्रवर्गातील विद्यार्थ्यांशी स्पर्धा करणे तसेच आवश्यक ते कौशल्य व गुणवत्ता विकास करणे, विद्यार्थ्यांना आर्थिक, सामाजिक व शैक्षणिकदृष्टया विविध क्षेत्रात स्पर्धेला तोंड देता यावे आणि शैक्षणिकदृष्टया उन्नती व्हावी या दृष्टीकोनातून राज्य शासनामार्फत इतर मागास वर्ग या प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी शासकीय वसतिगृह सुरु करणे आवश्यक आहे.

२. त्याचप्रमाणे महाराष्ट्र विधान मंडळाच्या इतर मागासवर्ग कल्याण समितीच्या पुणे येथील दौऱ्यामध्ये दिनांक ०५/१०/२०१५ रोजी झालेल्या बैठकीत जिल्हास्तरावर प्रत्येक जिल्हयात इतर मागास वर्ग या प्रवर्गातील मुलां-मुलींसाठी नवीन शासकीय वसतिगृहे सुरु करण्याची व त्यांची देखभाल करण्याची सूचना राज्य शासनास केलेली होती.

३. केंद्र शासनाच्या योजनेनुसार राज्यात मागणीनुसार जिल्हयाच्या ठिकाणी इतर मागास वर्ग या प्रवर्गातील मुलांसाठी १८ व मुलींसाठी १८ असे एकूण ३६ शासकिय वसतिगृह सुरु करण्यास दिनांक १५/१/२०१९ रोजी मा. मंत्रिमंडळाच्या झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे. मा. मंत्रिमंडळाच्या निर्णयानुसार शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१. प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे राज्यामध्ये इतर मागास वर्ग या प्रवर्गातील विद्यार्थ्यांच्या शिक्षणासाठी शासकीय वसतिगृह सुरु करणे आवश्यक आहे. हि बाब लक्षात घेऊन राज्यात जिल्हाच्या ठिकाणी मागणीनुसार मुलांसाठी १८ व मुलींसाठी १८ असे एकूण ३६ शासकीय वसतिगृह सुरु करण्यास शासन याद्वारे मान्यता देत आहे.

२. राज्यात जिल्हयाच्या ठिकाणी नवीन शासकीय वसतिगृह सुरु करण्यासाठी केंद्र शासनाच्या बाबु जगजीवन राम छात्र आवास योजनेंतर्गत १०० विद्यार्थी क्षमतेचे एका वसतिगृहाच्या इमारत बांधकामासाठी प्रती विद्यार्थी रु. ३.०० लक्ष या प्रमाणे १०० विद्यार्थ्यांसाठी येणाऱ्या निधीच्या मुलांसाठी ६०% व मुलींसाठी ९०% या प्रमाणात केंद्र शासनाचा हिस्सा उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. त्यामुळे केंद्र शासनाने मान्यता दिल्यास वसतिगृह बांधकामासाठीच्या रक्कमेचा मुलांसाठी ४०% व मुलींसाठी

१०% या प्रमाणात राज्य शासनाचा हिस्सा उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जिल्हयाच्या ठिकाणी केंद्र शासनाच्या निकषाप्रमाणे जमीन उपलब्ध झाल्यानंतर केंद्र शासनास प्रस्ताव सादर करण्यात येतील. केंद्र शासनाकडून प्रस्तावास मंजूरी मिळाल्यावर वसतिगृहाच्या इमारत बांधकामासाठी केंद्र व राज्य हिस्सा संदर्भात नवीन लेखाशिर्ष उपलब्ध करुन घेण्यात येतील व आवश्यक तेवढी तरतूद करण्यात येईल.

३. केंद्र शासनाच्या योजनेनुसार प्रत्येक वसतिगृहामध्ये १०० विद्यार्थ्यांना सुविधा उपलब्ध करुन देण्यात येईल. विद्यार्थ्यांना उच्च शिक्षण घेता यावे यासाठी मोफत निवास, भोजन, शैक्षणिक साहित्य, आरोग्य इत्यादी सोईसुविधा युक्त निवासाची व्यवस्था करण्यात येईल. उपरोक्त वसतिगृहात गुणवत्तेनुसार व विहित टक्केवारीनुसार प्रवेश देण्यात येईल. या वसतिगृहात इतर मागास वर्गीय विद्यार्थ्यांच्या व्यतिरिक्त इतर घटकातील विद्यार्थ्यांनाही पुढीलप्रमाणे प्रवेश देण्यात येईल.

| अ.क्र. | प्रवर्ग | टक्केवारी |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | इमाव | ४८ |
| २ | विजाभज | २६ |
| ३ | विमाप्र | ०५ |
| ४ | अनुसूचित जाती | ०७ |
| ५ | अनुसूचित जमाती | ०४ |
| ६ | अपंग | ०५ |
| ७ | अनाथ | ०२ |
| ८ | खुला | ०३ |
| **एकूण** | | **१००** |

वसतिगृहात प्रवेशाकरीता नियम व अटी पुढीलप्रमाणे आहेत.

१) विद्यार्थी हा महाराष्ट्र राज्याचा रहिवाशी असावा.

२) या वसतिगृहामध्ये इयत्ता ११ वी पासून पुढील शिक्षणासाठी प्रवेश देण्यात येईल.

३) व्यवसायिक अभ्यासक्रमाक प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांसाठी संबंधित प्रवर्गातील असलेल्या जागातून ५० टक्के जागा राखून ठेवण्यात येतील. व्यवसायिक अभ्यासक्रमासाठी विद्यार्थी उपलब्ध गुणवत्तेनुसार त्या संबंधित प्रवर्गातील विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात येतील.

४) इमाव व इतर प्रवर्गातील विद्यार्थ्यांच्या पालकांचे उत्पन्न रुपये १.०० लाखापेक्षा कमी किंवा राज्य सरकार मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्तीसाठी निर्धारीत करेल त्याप्रमाणे असेल.

५) या वसतिगृहामध्ये इयत्ता ११ वी प्रथम वर्ष पदविका, पदवी प्रमाणपत्र परिक्षा आणि वर्ष पदव्युत्तर पदवी यासाठी प्रवेश देण्यात येईल. यासाठी त्या त्या वेळी स्वतंत्रपणे प्रवेशासाठी अर्ज करावा लागेल व गुणवत्तेनुसार व प्रवर्गनिहाय विहित टक्केवारी नुसार प्रवेश निर्धारीत केले जातील.

६) विहित टक्केवारीनुसार वसतिगृह प्रवेश घेण्यासाठी विद्यार्थी उपलब्ध न झाल्यास सदर रिक्त राहणाऱ्या जागी इतर प्रवर्गातील विद्यार्थ्यास प्रवेश देण्यात येईल.

४. केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत इतर मागास वर्ग या प्रवर्गातील मुला-मुलींकरीता वसतिगृहाच्या योजनेकरीता पुर्तता करावयाच्या विहित अटी व शर्ती पुढीलप्रमाणे आहेत.

१) सदरील वसतिगृह केंद्र शासनाच्या धोरणानुसार सर्व विहित अटी व शर्तींचे परिपूर्ण पालन करतील.

२) वसतिगृहास मंजूरी मिळाल्याच्या तारखेपासून दोन वर्षाच्या आत वसतिगृहाचे बांधकाम पुर्ण करण्यात आले पाहिजे.

३) केंद्र शासनाकडून फक्त वसतिगृहाच्या इमारत बांधकामाकरीता अनुदान मिळेल, पुढील खर्च हे राज्य शासनामार्फत केले जातील.

४) वसतिगृह हे शैक्षणिक संस्थांच्या जवळपास होण्याबाबत विशेष लक्ष देण्यात यावे.

५) वसतिगृहांतील प्रवेशित मुला-मुलींसाठी प्रचलित कार्यपध्दतीनुसार ठेका पध्दतीने भोजनाची व्यवस्था केली जाईल.

६) जिल्हास्तरीय मुला-मुलींची वसतिगृहे ही १०० क्षमतेची असतील.

७) जिल्हा स्तरावरील वसतिगृहांची व्यवस्था पाहण्यासाठी प्रत्येक वसतिगृहासाठी नियमित व कंत्राटी पदे निर्माण करण्यास उच्चस्तर समितीची मान्यता घेण्यात येईल.

८) सदरील मुला-मुलींच्या शासकीय वसतिगृहांचा दर्जा, व्यवस्थापन आणि गुणवत्ता कायम राखली जावी यासाठी त्यांची नियमित तपासणी करण्यासाठी संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे आणि प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण व सहायक आयुक्त, समाजकल्याण यांच्या स्तरावरील निरीक्षक, लेखाधिकारी यांचा समावेश असलेले स्वतंत्र तपासणी पथक निर्माण केले जाईल.

९) इतर मागास वर्ग या प्रवर्गातील मुला-मुलींसाठी सर्व शासकीय वसतिगृहे ही सुसज्ज अशा शासकीय इमारतीमध्ये कार्यरत करण्याचा शासनाचा मानस असून ही वसतिगृहे लवकरात लवकर सुरु करण्यात येणार आहेत. त्यानुषंगाने संबंधित जिल्हाधिकारी यांनी वसतिगृहांकरीता प्राधान्याने शासकीय जमीन उपलब्ध करुन देण्याबाबत त्वरेने कार्यवाही करावी.

१०) या शासकीय वसतिगृहांच्या नवीन इमारत बांधकामाकरीता शासकीय जमीन उपलब्ध झाल्यानंतर सार्वजनिक बांधकाम विभागाने तात्काळ बांधकामाचा आराखडा व कामाचे अंदाजपत्रक तयार करुन संबंधित सहायक आयुक्त यांनी सविस्तर प्रस्ताव संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचेकडे सादर करावा, संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांनी सदरचा प्रस्ताव शासनास सादर करावा. सदरील वसतिगृहांचे बांधकाम त्वरेने हाती घेण्याच्या दृष्टीने, नियोजित बांधकामाचा नकाशा/आराखडा तयार करण्यासाठी विहित कार्यपध्दती अनुसरुन खाजगी वास्तुशास्त्रज्ञाची नेमणुक करण्याची मुभा संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांना राहिल.

११) नवीन वसतिगृहाच्या इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्यात आल्यानंतर आवश्यक निधी सदरील वसतिगृहाच्या इमारत बांधकामासाठी उपलब्ध करुन दिला जाईल.

१२) एकविसाव्या शतकातील स्पर्धात्मक युगास सामारे जाण्यासाठी मुला-मुलींच्या वसतिगृहांमध्ये संगणक लॅब, वाय-फाय सुविधा, अभ्यासिका व स्पर्धा परिक्षा केंद्र, विद्यार्थ्यांच्या सांस्कृतिक गुणांचा विकास होणेसाठी व कौशल्य विकास विशेष मार्गदर्शनासाठी स्वतंत्र हॉल इ. व्यवस्था/सुविधा या वसतिगृहांमध्ये पुरविण्यात येतील त्यांचा विचार करुन वसतिगृहांचा आराखडा तयार करुन बांधकाम करावे.

१३) सदर वसतिगृहांतील मुला-मुलींकरीता टेबल-खुर्ची, पुस्तके व वहया इ. साहित्य ठेवण्यासाठी कपाट तसेच कॉट, गादी, उशी, आंथरुण, पांघरुण, बेडशीट, ब्लँकेट इ. सुविधा पुरविण्यात येतील.

१४) मुलींच्या वसतिगृहांसाठी निर्माण होणारी पदे विशेषत्व:ने महिला उमेदवारांमधून भरती केले जातील.

१५) वसतिगृह प्रमुख आणि जिल्हा स्तरावरील वसतिगृह प्रमुख / गृहपाल यांचे वेतन व इतर कर्मचाऱ्यांचे वेतन तसेच वसतिगृहाचा खर्च मंजूर तरतुदीतून भागविण्यासाठी संबंधित वसतिगृहाचे “गृहपाल” यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. केंद्र शासनाच्या बाबु जगजीवनराम छात्र आवास योजनेंतर्गत अर्थसहाय्यातून इतर मागास वर्ग या प्रवर्गाच्या मुलांसाठी १८ व मुलींसाठी १८ अशा एकूण ३६ वसतिगृहाच्या बांधकामाकरीता येणाऱ्या खर्चाचा तपशिल खालीलप्रमाणे आहे :

**(रुपये लाखात)**

| अ क्र | वसतिगृह प्रकार | प्रति वसतिगृह मान्य विद्यार्थी संख्या | प्रति विद्यार्थी बांधकाम खर्च | प्रति वसतिगृह खर्च | प्रति वसतिगृह खर्च | | राज्यातील एकूण वसतिगृह संख्या | एकूण बांधकाम खर्च | ३६ वसतिगृहां-साठी केंद्र शासन हिस्सा | ३६ वसतिगृहां साठी राज्य शासन हिस्सा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| | | | | | केंद्र | राज्य | | | | |
| १ | **मुलींचे वसतिगृह** | १०० | ३ | ३०० | २७० | ३० | १८ | ५४०० | ४८६० | ५४० |
| २ | **मुलांचे वसतिगृह** | १०० | ३ | ३०० | १८० | १२० | १८ | ५४०० | ३२४० | २१६० |
| | **एकूण** | २०० | ६ | ६०० | ४५० | १५० | ३६ | १०८०० | ८१०० | २७०० |

६. केंद्र शासनाच्या बाबू जगजीवनराम छात्र आवास योजना यामधून अर्थसहाय्य घेऊन बांधण्यात येणाऱ्या वसतिगृहातील प्रती विद्यार्थी एकदाच रुपये २५००/- एवढी रक्कम फर्निचर/ उपकरण पुरविण्यासाठी अनावर्ती स्वरुपात केंद्र शासनाकडून प्राप्त होणार आहे.

७. सदरचे वसतिगृह बांधकाम झाल्यानंतर त्याचे कामकाज पाहण्यासाठी खालीलप्रमाणे कर्मचारी नियुक्त करणे गरजेचे असून त्यासाठी वित्त विभागाच्या उच्चाधिकार समितीच्या मान्यतेच्या अधीन राहून पदांच्या निर्मितीस मान्यता देण्यात येत आहे.

वसतिगृह स्तरावरील निर्माण करावयाच्या आवश्यक पदांचा तपशिल

| **अ. क्र.** | **मुले व मुलींच्या वसतिगृहातील कर्मचारी आकृतिबंध** | **प्रति वसतिगृह मान्य पदांची संख्या** | **पद निहाय मासिक वेतन रुपये** | **राज्यातील एकूण मान्य वसतिगृहांची संख्या** | **राज्यातील एकूण पद निहाय मासिक वेतन रुपये** | **राज्यातील एकूण पदनिहाय वार्षिक वेतन रुपये** |
|---|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** |
| १ | गृहपाल (पूर्णवेळ) (९३००-३४८०० ग्रेड पे ४३००) | ०१ | ३१३२८ | ३६ | ११२७८०८ | १३५३३६९६ |
| २ | कनिष्ठ लिपिक/ संगणक सहायक/ स्टोअर किपर वर्ग -३ (५२००-२०२०० ग्रेड पे १९००) | ०१ | १६५१७ | ३६ | ५९४६१२ | ७१३५३४४ |
| ३ | शिपाई (४४००-७४४० ग्रेड पे १३००) | ०१ | १३२३० | ३६ | ४७६२८० | ५७१५३६० |
| ४ | पहारेकरी (कंत्राटी पध्दतीने) (रुपये १०,०००/-) | ०३ | १०००० | १०८ | १०८०००० | १२९६०००० |
| ५ | सफाईकामगार (कंत्राटी पध्दतीने) (रुपये ६०००/-) | ०२ | ६००० | ७२ | ४३२००० | ५१८४००० |
| | **एकूण** | ८ | ७७०७५ | २८८ | ३७१०७०० | ४४५२८४०० |

संचालनालय स्तरावर वसतिगृहाच्या सनियंत्रणासाठी निर्माण करावयाच्या पदांचा तपशिल

| **अ. क्र.** | **संचालनालय स्तरावर सनियंत्रण यंत्रणा कर्मचारी आकृतिबंध** | **राज्यातील एकूण मान्य पदांची संख्या** | **पद निहाय मासिक वेतन रुपये** | **राज्यातील एकूण पद निहाय मासिक वेतन रुपये** | **राज्यातील एकूण पदनिहाय वार्षिक वेतन रुपये** |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | कार्यालय अधीक्षक (९३००-३४८०० ग्रेड पे ४३००) | ०१ | ३१३२८ | ३१३२८ | ३७५९३६ |
| २ | वसतिगृह निरीक्षक (५२००-२०२०० ग्रेड पे २४००) | ०२ | १७६५२ | ३५३०४ | ४२३६४८ |
| ३ | कनिष्ठ लिपिक (५२००-२०२०० ग्रेड पे १९००) | ०२ | १६५१७ | ३३०३४ | ३९६४०८ |
| | **एकूण** | ०५ | ६५४९७ | ९९६६६ | ११९५९९२ |

८. याद्वारे मान्यता देण्यात येणाऱ्या नव्याने सुरु करावयाच्या इतर मागास वर्ग या प्रवर्गाच्या ३६ वसतिगृहांसाठी खालीलप्रमाणे बाब निहाय आवर्ती खर्चासाठी रक्कम उपलब्ध करुन देण्यात येईल.

| अ. क्र. | बाब | प्रति वसतिगृह विद्यार्थी संख्या | प्रतीमाह प्रती विद्यार्थी दर रुपये | एकूण मासिक खर्च (रु. लाख) | वर्षाचा एकूण खर्च (प्रती वसतिगृह) (रु.लाख) | एकूण ३६ (१८ मुलांसाठी व १८ मुलींसाठी) वसतिगृहाचा खर्च (रु. लाख) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | भोजन खर्च (१० महिनेसाठी) | १०० | ३००० | ३.०० | ३०.०० | १०८०.०० |
| २ | निर्वाह भत्ता (१० महिनेसाठी) | १०० | ९०० | ०.९० | ९.०० | ३२४.०० |
| ३ | मुलींना स्वच्छता साधने (दरमहा १० महिन्यांसाठी) (१८ मुलींच्या वसतिगृहांसाठी) | १०० | २०० | ०.२० | २.०० | ३६.०० |
| ४ | वसतिगृह प्रवेशित मुलांना नाईट ड्रेस (प्रती विद्यार्थी दरवर्षी एकदाच) | १०० | ११०० | - | १.१० | ३९.६० |
| ५ | वैद्यकीय विद्यार्थ्यांकरीता ॲप्रेनसाठी (२० टक्के विद्यार्थी) | २० | १००० | वर्षातून एकदा देय | ०.२० | ७.२० |
| ६ | वैद्यकीय व इतर साहित्य प्रती विद्यार्थी (२० टक्के विद्यार्थी) | २० | २००० | वर्षातून एकदा देय | ०.४० | १४.४० |
| ७ | अभियांत्रिकी विद्यार्थी ब्रॉयलर सुट प्रति विद्यार्थी (२० टक्के विद्यार्थी) | २० | १००० | वर्षातून एकदा देय | ०.२० | ७.२० |
| ८ | अभियांत्रिकी पदवी / पदविका ड्रायव्हिंग बोर्ड इतर साहित्यासाठी प्रती विद्यार्थी (२६ टक्के विद्यार्थी) | २६ | ३००० | वर्षातून एकदा देय | ०.७८ | २८.०८ |
| ९ | शारीरिक शिक्षण महाविद्यालय गणवेश २ प्रती) (टक्के विद्यार्थी | ०२ | ४००० | वर्षातून एकदा देय | ०.०८ | २.८८ |
| १० | शैक्षणिक सहलीसाठी | १०० | १००० | वर्षातून एकदा देय | १.०० | ३६.०० |
| ११ | प्रोजेक्ट रिपोर्टसाठी | १०० | १००० | वर्षातून एकदा देय | १.०० | ३६.०० |
| १२ | स्नेहसंमेलन व सांस्कृतिक कार्यक्रम प्रती शासकीय वसतिगृहासाठी | - | - | वर्षातून एकदा देय | ०.२५ | ९.०० |
| १३ | क्रीडा वस्तू खरेदीसाठी प्रती शासकीय वसतिगृह | - | - | वर्षातून एकदा देय | ०.१० | ३.६० |
| १४ | पेस्ट कंट्रोल (वर्षातून दोनदा) प्रती वसतिगृह | - | - | वर्षातून दोनदा देय | ०.२० | ७.२० |
| १५ | इतर खर्च रुपये -/१५००० पती वसतिगृह | - | - | वर्षातून दोनदा देय | ०.१५ | ५.४० |
| | **एकूण आवर्ती खर्च** | | | | ४६.४६ | **१६३६.५६** |

९. याद्वारे मान्यता देण्यात येणाऱ्या नव्याने सुरु करावयाच्या इतर मागास वर्ग प्रवर्गाच्या ३६ वसतिगृहासाठी खालीलप्रमाणे बाब निहाय अनावर्ती खर्चासाठी रक्कम उपलब्ध करुन देण्यात येईल.

| अ. क्र. | बाब | वर्षाचा एकूण खर्च (प्रती वसतिगृह) (रु.लाख) | एकूण ३६ वसतिगृहाचा खर्च (रु. लाख) |
|---|---|---|---|
| १ | टी.व्ही. खरेदी प्रती शासकीय वसतिगृह (रुपये २५०००/- एकवेळ) | ०.२५ | ९.०० |
| २ | ॲक्वागार्ड (रुपये ९०००/-) व वॉटर कुलर्स (रुपये १५०००/-) प्रती वसतिगृह (एकवेळ) | ०.२४ | ८.६४ |
| ३ | अग्निशमन यंत्र प्रती वसतिगृह (५ नग) (प्रती नग रुपये ४०००/-) | ०.२० | ७.२० |
| ४ | संगणक व प्रिंटर व आवश्यक साहित्य ( रुपये ३००००+५०००+५०००= ४००००/-) प्रती वसतिगृहास (दोन संच) | ०.८० | २८.८० |
| ५ | अद्ययावत ग्रंथालय सुविधा प्रती वसतिगृह रुपये ३.०० लक्ष | ३.०० | १०८.०० |
| ६ | पालक सभेसाठी प्रती वसतिगृह रुपये १००००/- (दोन वार्षिक सभेसाठी) | ०.२० | ७.२० |
| | **एकूण अनावर्ती खर्च** | ४.६९ | १६८.८४ |

१०. सदरहू वसतिगृहाच्या दुरुस्तीसाठी होणारा खर्च राज्यशासनास करावा लागणार आहे. प्रत्येक वसतिगृहाच्या देखरेखीकरीता बांधकाम खर्चाच्या साधारणपणे १० टक्के इतका म्हणजेच रुपये ३०.०० लक्ष (बांधकाम खर्च प्रती वसतिगृह रुपये ३.०० कोटी) एवढा विचारात घेता एकूण ३६ वसतिगृहासाठी रुपये १०८.०० लक्ष रक्कमेची प्रतिवर्षी तरतुद करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

११. सदरच्या वसतिगृहाच्या बांधकाम, संचालन व व्यवस्थापनासाठी होणारा खर्च भागविण्यासाठी आवश्यक नवीन लेखाशिर्ष घेण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येत आहे.

१२. हा शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारीक संदर्भ क्रमांक-५७४/व्यय-१४, दिनांक २६/१२/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने व नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ११७/१४१३, दिनांक १९/११/२०१८ रोजीच्या सहमतीने तसेच मा. मंत्रिमंडळाने दिनांक १५/१/२०१९ रोजी घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१९०१३११२५२५०७२२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2019.01.31 13:03:59 +05'30'

**( भा. र. गावित )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री ( विजाभज ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. विरोधी पक्ष नेता,विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई/नागपूर.
६) अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८) जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे.
९) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे.
१०) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग.
११) सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण विभाग.
१२) सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद.
१३) निवासी लेखा परिक्षक, मुंबई.
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१६) निवड नस्ती (विजाभज-१).